महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील सेवानिवृत्त कर्मचा-यांच्या सेवानिवृत्तीवेतनापोटी प्राधिकरणाला अनुदान देण्यासाठी तात्पुरत्या स्वरुपात नवीन लेखाशीर्ष निर्माण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मजीप्रा-१११७/प्र.क्र.२३५/पापु-२३**
७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१
तारीख: ७ सप्टेंबर, २०१८

**वाचा :-**

शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः मजीप्रा-२०१४/प्र.क्र.३३(अ)/पापु-२३, दिनांक २३.०३.२०१७.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते तसेच निवृत्तीवेतन यांचे दायित्व शासनाने स्वीकारण्याचा व महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे जमा होणारे ईटीपी चार्जेस व तांत्रिक शुल्क शासनाकडे जमा करण्याचा धोरणात्मक निर्णय मंत्रीमंडळाच्या दिनांक १६.०३.२०१७ च्या बैठकीमध्ये घेण्यात आला असून त्यानुषंगाने दिनांक २३.०३.२०१७ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांच्या निवृत्तीवेतनावरील खर्चासाठी डिसेंबर, २०१७ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये “मागणी क्र. जी-६, २०७१- निवृत्तीवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभ, १०१- नियत सेवावधी व सेवानिवृत्ती भत्ते, (०२)- दि.१ एप्रिल, १९३६ नंतरच्या सेवेकरीता, (०२) (०१) दि.१ एप्रिल, १९३६ नंतरच्या सेवेकरीता (अनिवार्य) (२०७१ ०१०३), ०४- निवृत्तीवेतन विषयक खर्च” या लेखाशीर्षांतर्गत विधानमंडळासमोर लाक्षणिक पुरवणी मागणी सादर करण्यात आली होती. मात्र या लेखाशीर्षांतर्गत प्राधिकरणातून सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांच्या निवृत्तीवेतनासाठी सन २०१७-१८ मध्ये तांत्रिक अडचणींमुळे कोणताही खर्च होऊ शकला नाही. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांचे सेवानिवृत्तीवेतन इतर सेवानिवृत्त शासकीय कर्मचाऱ्यांप्रमाणे २०७१०१०३ या लेखाशीर्षांतर्गत नियमितपणे अदा करण्यासाठी काही कालावधी लागणार असल्यामुळे सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता प्राधिकरणाला अनुदान देण्याच्या दृष्टीने तात्पुरत्या स्वरुपात नवीन लेखाशीर्ष निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातून सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांच्या सेवानिवृत्तीवेतनासाठी प्राधिकरणाला अनुदान देण्याच्या दृष्टीने आर्थिक तरतूद करण्यासाठी पुढीलप्रमाणे तात्पुरत्या स्वरुपात नवीन लेखाशीर्ष उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| मागणी क्र. वाय-२ | Demand No. Y-2 |
| २२१५ - पाणी पुरवठा व स्वच्छता | 2215- Water Supply and Sanitation |
| १९९ - इतर अशासकीय संस्थांना सहाय्य | 199- Assistance to Other Non-Government Institutions |
| ०१ - इतर अशासकीय संस्थांना सहाय्य | 01- Assistance to Other Non-Government Institutions |
| (०१) (०४) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे वर्ग झालेल्या शासकीय कर्मचा-यांना निवृत्तीवेनाचे लाभ मंजूर करण्यासाठी शासकीय अनुदान (२२१५A०५२)<br>( अनिवार्य / दत्तमत )<br>३१ - सहायक अनुदान (वेतनेतर) | (01)(04)- Grant-in-aid to Maharashtra Jeevan Pradhikaran for authorising pensionary benefits to the absorbed Government Servants (2215A052)<br>(Committed/Voted)<br>31- Grant-In-Aid (Non-Salary) |

२. सदर लेखाशीर्ष केवळ सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता तात्पुरत्या स्वरुपात मंजूर करण्यात येत आहे.

३. प्रधान महालेखाकार कार्यालयाचे पत्र क्रमांक ख.वि./चा-१ पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग/युओआर-३०/२०१८-१९/५९१, दिनांक १.०८.२०१८ अन्वये प्राप्त सहमतीनुसार तसेच वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक २१५/व्यय-३, दिनांक १८.०८.२०१८, २०७/अर्थ-१८, दिनांक २९.०८.२०१८ अन्वये प्राप्त सहमतीनुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९०६१६०२११७८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Balasaheb B Hajare

Digitally signed by Balasaheb B Hajare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, cn=Balasaheb B Hajare
Date: 2018.10.16 13:15:54 +05'30'

**( बाळासाहेब बा. हजारे )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवी मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र १, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

प्रत: माहितीस्तव,

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
अप्पर मुख्य सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे स्वीय सहायक, जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई.
वित्त विभाग, व्यय-३/ अर्थसंकल्प-१८ कार्यासन, मंत्रालय, मुंबई.
पापु-४, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई.
निवडनस्ती, पापु-२३